**डॉ. होमी भाभा स्टेट विद्यापीठ, मुंबई या समूह विद्यापीठास सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात पुनर्विनियोजनाने उपलब्ध झालेला निधी वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

उच्च व तंत्र शिक्षण विभाग

शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०२२/प्र.क्र.०५/विशि-३

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२

दिनांक : ३० मार्च, २०२२.

**पहा** :- १) शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्रमांकः- संकीर्ण-२०२१/प्र.क्र.१६२/विशि-३, दि.१४.१०.२०२१

२) शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्रमांकः-अर्थसं-२०२१/(प्र.क्र.८९/२१)/ मशि-३, दि.१४.१२.२०२१.

३) शासन परिपत्रक, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्रमांकः-पूरक-२०२१/प्र.क्र.६८/साशि-१, दि.०६.०१.२०२२.

४) कुलसचिव, डॉ.होमी भाभा स्टेट विद्यापीठ, मुंबई यांचे पत्र क्र. रजि./HBSU/ २०२०-२१/२-१७०, दि.०९.०२.२०२२.

५) शासन ज्ञापन, क्रमांकः- संकीर्ण-२०२२/प्र.क्र.५/विशि-३, दि.१८.०२.२०२२

६) कुलसचिव, डॉ.होमी भाभा स्टेट विद्यापीठ, मुंबई यांचे पत्र क्र. रजि./HBSU/ २०२०-२१/२-१८०, दि.२२.०२.२०२२.

७) शासन ज्ञापन, क्रमांकः- संकीर्ण-२०२२/प्र.क्र.५/विशि-३, दि.२४.०२.२०२२

८) शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्रमांकः- संकीर्ण-२०२१/प्र.क्र.४२/विशि-३, दि.२२.०३.२०२२

९) पुनर्विनियोजन शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०२२/प्र.क्र.०५/विशि-३, दि.३०.०३.२०२२.

**प्रस्तावनाः-**

राष्ट्रीय उच्चतर शिक्षा अभियान (रुसा) अंतर्गत “Creation of Universities by Conversion of Colleges in a Cluster” या घटकाअंतर्गत महाराष्ट्र सार्वजनिक विद्यापीठ अधिनियम, २०१६ च्या कलम ३ (६) मधील तरतूदीस अनुसरुन डॉ. होमी भाभा स्टेट विद्यापीठ, मुंबई हे समूह विद्यापीठ दि.१३ फेब्रुवारी, २०१९ रोजीच्या अधिसूचनेद्वारे स्थापन करण्यात आले आहे. सदर विद्यापीठाकरिता आवश्यक असणाऱ्या सांविधिक तसेच नियमित व कंत्राटी पदांची निर्मिती अनुक्रमे दि. ०७ मार्च, २०१९ व दि.०३ नोव्हेंबर, २०२२ या शासन निर्णयान्वये करण्यात आली आहे. सदर पदांच्या वेतन तसेच विद्यापीठाच्या वेतनेत्तर खर्चासाठी स्वतंत्र लेखाशीर्ष संदर्भाधीन क्र.(१) येथील दि. १४ ऑक्टोबर, २०२१ च्या शासन परिपत्रकान्वये मंजूर करण्यात आले आहे.

डॉ. होमी भाभा स्टेट विद्यापीठ, मुंबई या समूह विद्यापीठास आर्थिक निधीसाठी रुसाव्यतिरिक्त कोणतेही स्त्रोत उपलब्ध नाहीत. तसेच रुसाकडून कोणताही निधी अद्याप उपलब्ध झालेला नाही. त्यामुळे निधीअभावी विद्यापीठाला विकासात्मक तसेच साधनसामुग्रीसंदर्भात अनेक अडचणींना सामोरे जावे लागत आहे. सदर विद्यापीठाचे काम सुरळीत व नियमित स्वरुपाने सुरु

ठेवण्याकरिता विद्यापीठाने विविध उद्दिष्टांकरिता केलेल्या व करावयाच्या खर्चाकरिता रु.७७,०२,१७५/- इतक्या निधीची आवश्यकता असल्याने सदर निधी पुनर्विनियोजनाद्वारे उपलब्ध करुन देण्याकरिता प्रस्ताव नियोजन व वित्त विभागास सादर केला असता, नियोजन व वित्त विभागाने रु.७७,०२,१७५/- इतका निधी पुनर्विनियोजनाद्वारे उपलब्ध करुन देण्यास मान्यता दिली आहे. त्यास अनुसरुन संदर्भ क्र.(७) येथील शासन निर्णयान्वये, डॉ. होमी भाभा स्टेट विद्यापीठ, मुंबई विद्यापीठास रु.७७,०२,१७५/- इतका निधी वितरीत करण्यात आला आहे.

डॉ. होमी भाभा स्टेट विद्यापीठ, मुंबई या समूह विद्यापीठाच्या पदाधिकारी व त्यांच्या कार्यालयाकरिता तात्पुरत्या स्वरुपात दालने बनविण्याकरिता फेरफार/फेररचना/फर्निचर इ. कामाचे दुरुस्ती व नुतनीकरण करण्याकरिता रु.१,६६,१९,९२४ एवढया रक्कमेच्या खर्चाच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देऊन निधी उपलब्ध करुन देण्याची संदर्भ क्र.(४) येथील पत्रान्वये विनंती केली आहे. त्यास अनुसरुन सदर प्रस्तावास संदर्भ क्र.(५) येथील दिनांक १८.०२.२०२२ रोजीच्या ज्ञापनान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. तसेच प्रस्तुत कामाच्या विद्युतीकरणाच्या कामाकरिता रु.७८,५८,९९९ एवढया रक्कमेच्या खर्चाच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देऊन निधी उपलब्ध करुन देण्याची संदर्भ क्र.(६) येथील पत्रान्वये विनंती केली आहे. त्यास अनुसरुन सदर प्रस्तावास संदर्भ क्र.(७) येथील दिनांक २४.०२.२०२२ रोजीच्या ज्ञापनान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. अशाप्रकारे दोन्ही कामांसाठी एकूण रु.२४४.७८९२३ लक्ष इतका निधी आवश्यक असल्याने सदर कामांसाठी २२०२ जे ०६३, ३१ सहायक अनुदाने वेतनेत्तर या लेखाशिर्षाखाली निधी उपलब्ध नसल्याने लेखाशिर्ष २२०२ आय ७१९ या लेखाशिर्षातून रु.२४४.७८९२३ लक्ष इतकी रक्कम पुनर्विनियोजनाने उपलब्ध करुन देण्याची नियोजन व वित्त विभागास विनंती करण्यात आली असता, सदर प्रस्तावास नियोजन व वित्त विभागाने सहमती दिली असून निधी पुनर्विनियोजनाद्वारे उपलब्ध करुन देण्यास मान्यता दिली आहे. संदर्भ क्र.(८) येथील पुनर्विनियोजन मान्यतेनुसार, डॉ. होमी भाभा स्टेट विद्यापीठ, मुंबई विद्यापीठास निधी उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

डॉ. होमी भाभा स्टेट विद्यापीठ, मुंबई या समूह विद्यापीठाच्या पदाधिकारी व त्यांच्या कार्यालयाकरिता तात्पुरत्या स्वरुपात दालने बनविण्याकरिता फेरफार/फेररचना/फर्निचर इ. कामाचे दुरुस्ती व नुतनीकरण तसेच विद्युतीकरण कामांकरिता दिलेल्या उपरोक्त प्रशासकीय मान्यतेनुसार रु.२४४.७८९२३ लक्ष इतकी रक्कम आवश्यक असल्याने सदर निधी उपलब्ध करुन देण्याच्या अनुषंगाने, सन २०२१-२०२२ या आर्थिक वर्षात पुनर्विनियोजनाद्वारे उपलब्ध असलेल्या निधीतून **रु.२,४४,७८,९२३/- (रुपये दोन कोटी चव्वेचाळीस लक्ष अठ्ठ्याहत्तर हजार नऊशे तेवीस फक्त)** इतकी तरतूद खालील अटींच्या अधीन राहून संचालक, उच्च शिक्षण, पुणे यांना वितरीत करण्यात येत आहे.

२. (१) महाराष्ट्र सार्वजनिक विद्यापीठ अधिनियम २०१६ नुसार शासनाकडून मंजूर झालेले अनुदान हे "विद्यापीठ निधी" (University Fund) मध्ये जमा करुन अनुदानाचे व्यवस्थापन करण्याची जबाबदारी व्यवस्थापन परिषदेची असेल. तसेच सदर अनुदानातून करण्यात आलेल्या खर्चाचे विनिमय करुन खर्चाच्या लेख्यांचे विवरणपत्र सर्वसाधारण परिषदेपुढे ठेवून त्यास मान्यता घेण्याची कार्यवाही विद्यापीठाने करावी.

(२) डॉ. होमी भाभा स्टेट विद्यापीठ, मुंबई विद्यापीठाच्या कुलगुरु यांनी शासनाकडून ज्या प्रयोजनार्थ अनुदान मंजूर करण्यात आलेले आहे, हे अनुदान त्याच प्रयोजनार्थ खर्च करण्यात आले आहे, हे पाहण्याची जबाबदारी कुलगुरु यांची असेल. यासंदर्भात त्यांनी व्यवस्थापन परिषदेची मान्यता घेऊन त्याचे उपयोगिता प्रमाणपत्र उच्च शिक्षण संचालनालयामार्फत शासनास सादर करावे.

(३) वरील सर्व अनुदानाची सर्व कागदपत्रे व हिशेब महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई किंवा प्रकरणपरत्वे महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर यांनी सदर कामाकरिता प्राधिकृत केलेले अधिकारी यांना तपासण्याचे अधिकार असून, त्यांनी मागणी केल्यास, सर्व कागदपत्रे त्यांचेकडे तपासणीकरिता विद्यापीठाने सादर केली पाहिजेत.

(४) विद्यापीठास ज्या उद्दिष्टासाठी अनुदान मंजूर केलेले आहे त्याच उद्दिष्टासाठी मंजूर केलेल्या अनुदानाचा वापर करावा.

(५) यासंदर्भात वित्तीय अधिकार नियम पुस्तिकेतील तरतुदी व अटीचे ततोतंत पालन करावे. तसेच शासनाच्या प्रचलित नियम व अटी, शर्ती विचारात घेऊन कार्यवाही करण्यात यावी.

३. सदरहू मंजूर झालेली तरतुद डॉ. होमी भाभा स्टेट विद्यापीठ, मुंबई यांना तातडीने सुपूर्द करण्याची सर्वस्वी जबाबदारी संचालक (उच्च शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे यांची राहील. तसेच वरील अनुदानाची सर्व कागदपत्रे व हिशेब महालेखापाल, महाराष्ट्र-१ किंवा प्रकरणपरत्वे महालेखापाल -२ नागपूर यांनी सदर कामाकरीता प्राधिकृत केलेले अधिकारी यांना तपासण्याचे अधिकार असून, त्यांनी मागणी केल्यास, सर्व कागदपत्रे त्यांच्याकडे तपासणीकरीता विद्यापीठाने सादर केली पाहिजेत. विद्यापीठास ज्या उद्दिष्टासाठी मंजुर केलेल्या अनुदानाचा वापर त्याच उद्दिष्टासाठी करावा. तसेच विहीत कालावधीमध्ये सदरचा खर्च पूर्णपणे करण्यात येईल याची दक्षता घेण्यात यावी आणि त्याबाबतचे विनियोग प्रमाणपत्र (Utilization Certificate) संचालक, उच्च शिक्षण, पुणे यांचेमार्फत शासनास विहित वेळेत सादर करण्यात यावे.

४. सदर खर्च " मागणी क्र.डब्ल्यू-२ (२२०२) सर्वसाधारण शिक्षण, ०३, विद्यापीठीय व उच्च शिक्षण, १०२ विद्यापीठांना सहाय्य, (००) (३३) समूह विद्यापीठ (कार्यक्रम) (२२०२ जे ०६३) ३१-सहायक अनुदाने (वेतनेत्तर)" या लेखाशिर्षाखाली सन २०२१-२०२२ मधील मंजूर तरतूदीतून खर्ची टाकण्यात यावा. वरील अटींचे तंतोतंत पालन करण्याची जबाबदारी डॉ. होमी भाभा स्टेट विद्यापीठ, मुंबई यांची राहील.

५. हा शासन निर्णय, वित्त विभाग, शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.१४ ऑक्टोबर, २०२१ व दि.०३ फेब्रुवारी, २०२२ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे. दि.१४ ऑक्टोबर, २०२१ रोजीच्या परिपत्रकाच्या परिशिष्टातील अनुक्रमांक ९ मध्ये नमूद अटींची पूर्तता होत आहे.

६. सदर शासन निर्णय, नियोजन विभागाचे अनौपचारिक संदर्भ क्र.११५/१४७१, दि.०७.०३.२०२२ आणि वित्त विभागाचे अनौपचारिक संदर्भ क्र.३९८/२०२२/व्यय-५, दि.२५.०३.२०२२ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०३३०१५३९३६३००८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

PRAVINKUMAR GULABRAO PAWAR

Digitally signed by PRAVINKUMAR GULABRAO PAWAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL, 2.5.4.20=5d2dad0f66e8336730e2b666877a365c20f60db099de815eecadde01ca77f148, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=8F18625ADB482A7EE2512CEA93CE697388C95A99C89E41E85C05A3DE8476488F, cn=PRAVINKUMAR GULABRAO PAWAR
Date: 2022.03.30 15:42:02 +05'30'

**(प्रविणकुमार पवार)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. राज्यपाल तथा कुलपती यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२) कुलगुरू, डॉ. होमी भाभा स्टेट विद्यापीठ, मुंबई.
३) संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे (५ प्रती)
४) सह संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई विभाग.
५) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता)-१/२ महाराष्ट्र मुंबई / नागपूर.
६) महालेखापाल, (लेखा परीक्षण) -१/२ महाराष्ट्र मुंबई / नागपूर.
७) कुलसचिव, डॉ. होमी भाभा स्टेट विद्यापीठ, मुंबई.
८) अधिदान व लेखा अधिकारी, पुणे/ मुंबई.
९) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे/ मुंबई.
१०) नियोजन विभाग (१४७१), मंत्रालय, मुंबई.
११) वित्त विभाग, (अर्थसंकल्प-३)/(व्यय-५) मंत्रालय, मुंबई.
१२) मा. प्रधान सचिव. उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१३) उप सचिव (विशि), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१४) कार्यासन अधिकारी (साशि-१), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई यांना कळविण्यात येते की, उपरोक्त वितरीत करण्यात आलेला निधी तात्काळ बीम्स प्रणालीवर उपलब्ध करुन देण्यात यावा.
१५) निवड नस्ती (विशि-३), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.